**दिनांक १७ सप्टेंबर २०२२ रोजी मराठवाडा मुक्ती संग्रामाचे अमृत महोत्सवी वर्ष साजरे करण्यासाठी कार्यक्रमांचे आयोजन व त्याची रुपरेषा निश्चित करण्यासंबंधी मंत्रिमंडळ उपसमिती स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-१९२२/प्र.क्र.६१/स्वासैक-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ४ मे, २०२२.

**प्रस्तावना :**

राज्यातील मराठवाडा हा भाग "हैद्राबाद पोलीस कारवाईने" निजामी राजवटीतून दिनांक १७ सप्टेंबर १९४८ रोजी मुक्त झाला. त्या घटनेच्या स्मृतिप्रित्यर्थ प्रत्येक वर्षी १७ सप्टेंबर हा दिवस "मराठवाडा मुक्ती संग्राम दिन" म्हणून मराठवाडा विभागातील सर्व जिल्हयांमध्ये साजरा करण्यात येतो. मराठवाडा विभागात या दिवशी विभागीय मुख्यालय औरंगाबाद येथे सर्व शासकीय, निमशासकीय व स्थानिक स्वराज्य संस्थाच्या इमारतीवर राष्ट्रध्वज उभारण्यात येतो. या निमित्त होणा-या शासकीय समारंभात मराठवाडयातील सर्व जिल्हा मुख्यालयांच्या ठिकाणी पालकमंत्री महोदयांच्या हस्ते / तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी उप विभागीय अधिकारी/तहसिलदार यांचे हस्ते / गाव पातळीवर सरपंचाच्या हस्ते राष्ट्रध्वजारोहण होते. या प्रकरणी मराठवाडा मुक्ती संग्रामाचे अमृत महोत्सवी वर्ष सुरु होत असून त्यानिमित्ताने मराठवाडयात विविध कार्यक्रमाचे आयोजन व त्या कार्यक्रमाची रुपरेषा तयार करण्यासाठी मंत्रिमंडळ उपसमिती नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दिनांक १७ सप्टेंबर, २०२२ रोजी मराठवाडा मुक्ती संग्रामाचे अमृत महोत्सवी वर्ष सुरु होत आहे. या निमित्ताने कार्यक्रमाचे आयोजन व त्याची रुपरेषा निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे "मंत्रिमंडळ उपसमिती" गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**सदर मंत्रिमंडळ उपसमितीची रचना पुढीलप्रमाणे राहील :-**

| अ. क्र. | मराठवाडयातील सर्व मंत्री तथा पालकमंत्री यांचे नाव | कार्यभार | प्रस्तावित समितीमधील पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. सुभाष देसाई | उदयोग, खनिकर्म, मराठीभाषा | अध्यक्ष |
| २ | श्री. अशोक चव्हाण | सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) | सदस्य |
| ३ | श्री. राजेश टोपे | सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण | सदस्य |
| ४ | श्रीम. वर्षा गायकवाड | शालेय शिक्षण | सदस्य |
| ५ | श्री. अमित देशमुख | वैद्यकिय शिक्षण | सदस्य |
| ६ | श्री. संदिपान भुमरे | रोजगार हमी योजना व फलोत्पादन | सदस्य |
| ७ | श्री. शंकरराव गडाख | मृद व जलसंधारण | सदस्य |
| ८ | श्री. धनंजय मुंडे | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य | सदस्य |

तसेच मंत्रिमंडळ उपसमितीचे सदस्य सचिव म्हणून विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

**मंत्रिमंडळ उपसमितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे प्रस्तावित करण्यात येत आहे :-**

- मराठवाडा विभागातील प्रत्येक जिल्हयामध्ये मराठवाडा मुक्तीसंग्राम दिनाचे अमृतमहोत्सवी वर्ष साजरे करणेबाबत रुपरेषा निश्चित करणे.
- निजामाच्या राजवटीतून मराठवाडा मुक्त करण्यासाठी ज्या हुतात्म्यांनी प्राणांची आहुती दिली त्यांच्या स्मरणार्थ कार्यक्रमाचे आयोजनाबाबत दिशा निर्देश निश्चित करणे.
- मराठवाडा विभागातील सर्व शासकीय / निमशासकीय कार्यालयांमध्ये तसेच महत्वाच्या ठिकाणी अमृतमहोत्सवी वर्षा निमित्त शासकीय कार्यक्रम तसेच रक्तदान शिबीर इत्यादी कार्यक्रमांचे आयोजनाबाबत नियोजन करणे व मराठवाडा विभागातील नागरिकांना अमृतमहोत्सवी वर्षाच्या निमित्ताने आयोजित करावयाचे विविध कार्यक्रमांमध्ये सामावून घेणेबाबत नियोजन करणे.
- मराठवाडा मुक्तीसंग्राम दिनाचे अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त आयोजित केलेल्या कार्यक्रमांबाबतचा अहवाल मा. मुख्यमंत्री महोदय यांना सादर करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाचा www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक क्र. २०२२०५०४१६२६१८५७०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arun Vishnupant Joshi

Digitally signed by Arun Vishnupant Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9259fd2784a8d30c4f6f0006e8bf46ad68504f9d5fc11ced9b11431fd186a790, serialNumber=7f0220f1418de280ee59330c50f6cf32874048e40feb0d8d5e96bc96330d791f, cn=Arun Vishnupant Joshi
Date: 2022.05.04 16:28:12 +05'30'

**( अ.वि. जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
७. मा. उपमुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२,
८. सर्व संबंधित मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
९. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मा. विधीमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
११. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२,
१२. मा.प्रधान सचिव (वि.चौ.अ.१) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२,
१३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
१४. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर
१५. महालेखापाल ( लेखापरिक्षा ), महाराष्ट्र १, मुंबई / नागपूर

१६. सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र
१७. सह सचिव (स्वा.सै.क.१), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८ निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन - २५
२२. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, ( अर्थसंकल्प १४/ व्यय-४ ) मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती ( स्वा.सै.क.१)